शासकीय / अनुदानीत आश्रमशाळेतील
शिक्षकांना प्रशिक्षण देणेकरीता ८ प्रशिक्षण
केंद्रे सुरु करणेबाबत...

# महाराष्ट्र शासन

शासन निर्णय क्र. शाआशा-२००३/प्र.क्र.९९/का.१३
आदिवासी विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १४ ऑगस्ट, २००३.

**वाचा** :-१) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्रमांक:शाआशा-२००३/ प्र.क्र.२७/का.८(१), दिनांक २० जून,२००३.

२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र. बीयुडी/पूरक मागण्या/ प्र.क्र.४२/का.७, दिनांक ८ ऑगस्ट, २००३.

**प्रस्तावना** :- शासकीय/अनुदानीत आश्रमशाळेतील शिक्षकांना प्रशिक्षण देण्याकरीता ८ प्रशिक्षण केंद्रे सुरु करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :- शासकीय/अनुदानीत आश्रमशाळेतील शिक्षकांना प्रशिक्षण देण्याकरीता ८ प्रशिक्षण केंद्रे सन २००३-०४ या वर्षापासून सुरु करण्यास या शासन निर्णयानुसार मंजुरी देण्यात येत आहे.

२. ही बाब विधानमंडळाच्या निदर्शनास आणण्यासाठी व विधी मंडळाच्या मान्यतेसाठी रु.१,०७,४३,२००/- एवढ्या रकमेची पूरवणी मागणी विधी मंडळाच्या सन- २००३ च्या पावसाळी अधिवेशनात सादर करण्यात आली होती. सदर पुरवणी मागणीस विधीमंडळाची मान्यता होऊन विधीमंडळाने महाराष्ट्र (द्वितीय पुरवणी) विनीनियोजन अधिनियम-२००३ (सन-२००३ चा महाराष्ट्र अधिनियम सन -२००३ चा अधिनियम क्र.२०) पारीत केलेला आहे. त्याचप्रमाणे प्रस्तावनेतील क्र. २ वरील दि. ८ ऑगस्ट,२००३ च्या शासन निर्णयान्वये खर्चासाठी मान्यता देण्यात आलेली आहे. सदर निधी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्या अधिनस्त ठेवण्यात आलेला आहे.

३. आदिवासी विकास आयुक्त, महाराष्ट्र राज्य नाशिक अंतर्गत अपर आयुक्त, आदिवासी विकास ठाणे/अमरावती/नाशिक/नागपूर या कार्यक्षेत्रातील सर्व शासकीय व अनुदानीत आश्रमशाळेतील शिक्षकांना प्रशिक्षण देण्यात येणार आहे. या प्रशिक्षणामध्ये

राज्यातील सुमारे ९००० शिक्षकांचे १८० प्रशिक्षण सत्राकरीता प्रति प्रशिक्षण सत्र रु. २०,०००/- याप्रमाणे खर्च अपेक्षित आहे. यासाठी आवर्ती खर्च रु. ३५,४०,०००/-, अनावर्ती खर्च रु. ७२,०३,२००/- एकूण रक्कम रु. १,०७,४३,२००/- एवढा वार्षिक येणार आहे.

४. या योजनेंचे उद्दीष्ट शासकीय व अनुदानीत आश्रमशाळेतील सर्व शिक्षकांना निवासी व शालेय विद्यार्थ्यांची काळजी (custodial care) यासंदर्भात सर्वंकष प्रशिक्षण देण्यात येणार आहे. इयत्ता १ ली ते इयत्ता १० वी चे वर्ग घेणा-या सर्व प्राथमिक व माध्यमिक मुख्याध्यापक व शिक्षकांना विद्यार्थ्यांचा शैक्षणिक दर्जा उंचावण्याच्या दृष्टीने प्रशिक्षण देण्यात येणार आहे. विद्यार्थ्यांच्या मानसिक गरजा व बदलता वार्षिक अभ्यासक्रम, शैक्षणिक विकासाची मुलभूत संकल्पना, आधुनिक तंत्रज्ञान, आश्रमशाळांमधील विद्यार्थ्यांची गुणवत्ता वाढवणे व मुलांच्या विकासास चालना देणे यांचा विचार करुन शिक्षकांना गुणवत्तापूर्ण असे प्रशिक्षण देणे आहे. प्रशिक्षण महाराष्ट्र शैक्षणिक संशोधन प्रशिक्षण परिषद, पुणे व संचालक, राज्य शिक्षण संस्था, पुणे यांचे धर्तीवर असावी.

५. या योजनेच्या अंमलबजावणीची कार्यपध्दती शासकीय व अनुदानित आश्रमशाळेतील शिक्षकांना प्रशिक्षण देताना प्रथमत: प्रत्येक शाळेमधील निवडक शिक्षकांची मास्टर ट्रेनर मधून निवड करण्यात येईल. मास्टर ट्रेनरमधून निवडक मास्टर ट्रेनर प्रशिक्षित करुन त्यांच्यामधून त्या-त्या प्रकल्पातील सर्व विषयांच्या विषय शिक्षकांना टप्प्याटप्प्याने ५ किंवा १० दिवसांचे प्रशिक्षण निवडलेल्या प्रशिक्षण केंद्राच्या ठिकाणी देण्यात येईल.त्या प्रकल्पामधील शिक्षण विभागाकडील, जिल्हापरिषदांकडील व खाजगी संस्थेमधील सेवानिवृत्त शिक्षकांचे पॅनल तयार करण्यात येईल. प्रत्येक केंद्राकरीता अपर आयुक्त स्तरावर सल्लागार समिती राहील व त्यानुसार ८ प्रशिक्षण केंद्राचे कामकाज चालविण्यात येईल. तसेच या प्रशिक्षण केंद्राचा समन्वय आयुक्त,आदिवासी विकास, नाशिक यांचे स्तरावर राहील.

६. प्रशिक्षण केंद्राच्या स्थानिक परिसरामधील नामवंत व तज्ञ, विविध प्रबोधिनी व शैक्षणिक क्षेत्रात भरीव कामगिरी केलेले शिक्षक व कार्यकर्ते यांना प्रशिक्षक म्हणून सहभागी करुन घेतले जाईल तसेच स्वयंसेवी संस्था व प्रशिक्षीत शिक्षक यांचाही सहभाग या प्रशिक्षण केंद्रात राहणार आहे. राज्यातील ४ अपर आयुक्त यांचे कार्यक्षेत्रातील २४ प्रकल्पामधील सर्व शासकीय/अनुदानीत आश्रमशाळांमधील ९००० शिक्षकांना प्रशिक्षण केंद्रामधून प्रशिक्षण देण्यात येईल. ही योजना राबविणारी यंत्रणा आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक, अपर आयुक्त, आदिवासी विकास आयुक्त ठाणे/नाशिक/अमरावती/नागपूर, सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प अशी राहील.

७. ही योजना अपर आयुक्त, आदिवासी विकास यांच्या पातळीवर राबविण्यात येणार असल्यामूळे त्यांचे नियंत्रणाखाली शिक्षकांची निवड प्रकल्प अधिकारी करतील. सर्व शिक्षकांना हे प्रशिक्षण सेवाअंतर्गत प्रशिक्षण म्हणून सक्तीचे आहे. विभागातील

कार्यरत प्रशिक्षणार्थींमधून मास्टर ट्रेनर म्हणून त्यांची निवड करण्यात येईल. प्रशिक्षणार्थींचे नामनिर्देशन, त्यांची निवास व भोजनाची व्यवस्था प्रशिक्षण केंद्रावर शासनाच्या वतीने करण्यात येईल. दर तीन महिन्यांनी प्रशिक्षण सत्राचा आढावा घेण्यात येऊन सत्रनिहाय प्रशिक्षणाच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र अपर आयुक्त, आयुक्त कार्यालयास सादर करण्यात यावे.

८. हा खर्च मुख्यलेखाशिर्ष मागणी क्रमांक टी-४ २२२५, अनुसूचित जाती जमाती व इतर मागासवर्गियांचे कल्याण - पंचवार्षिक योजना - जनजाती क्षेत्र योजना-०२-अनुसूचित जमातीचे कल्याण २७७ - शिक्षण(४) आश्रमशाळा समूह (०४)(०१) (ए) राज्य योजनांतर्गत योजना (२२२५ १५८२) या लेखाशिर्षाखली खर्ची टाकण्यात यावा.

९. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५४४/०३/व्यय-१४, दिनांक २४.६.२००३ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चि.नि.सुर्यवंशी )
अवर सचिव

प्रति,

आयुक्त,आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक ( ५ प्रती)
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
महालेखापाल ( लेखा परीक्षा ), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे / नाशिक / अमरावती / नागपूर.
सहसंचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, ५ वा मजला नविन प्रशासन भवन, मुंबई ३२
वित्त विभाग/व्यय-१४, अर्थसंकल्प-३ व १७
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
खाजगी सचिव, मा. मंत्री / राज्यमंत्री (आदिवासी विकास), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
सर्व कार्यासने, आदिवासी विकास विभाग,मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
निवड नस्ती कार्यासन-१३.